# भारतीय पर्यावरण चळवळ
# मोटार सोडा... आरोग्यासाठी, देशासाठी आणि भावी पिढ्यांसाठी
## बस, सायकल वापरू, प्रदूषणापासुन शहर वाचवू

वर्षाला ६०० कोटी टन कार्बन डाय ऑक्साईड व तत्सम वायुंची पृथ्वीच्या वातावरणातील वाढ आणि त्यामुळे होत असलेल्या तापमानवाढीमुळे या शतकात मानव जातीचे उच्चाटन होण्याची स्पष्ट शक्यता दिसू लागली आहे. पॅरिस येथील परिषदेत त्यामुळेच जगभरातील १९६ देशांचे प्रमुख एकत्र आले होते. कोळसा, तेल, वायू, अणू (युरेनिअम इंधन चक्र) या खनिज उर्जांचा वापर याला कारणीभूत आहे. ते तातडीने कमी करणे व शक्य तेथे थांबविणे अत्यंत आवश्यक आहे. उर्जाविरहित जीवनपद्धती हा जीवन वाचवण्याचा मार्ग आहे. सायकल हे वाहन मानवी उर्जेवर चालते, त्यादृष्टीने सायकल हे आदर्श वाहन आहे.

**मोटारीची वाहतुकीची क्षमता नगण्य, व्यवस्थापनदृष्ट्या मोटार वाहतुकीचे साधन नाही...**

धावणाऱ्या मोटारींमध्ये वापरली जाणारी आसन क्षमता फक्त १.५ (दीड माणसे) एवढीच असते. एक सिंगल डेकर बस ३५ मोटारींना पर्याय देते. तर एक डबल डेकर बस ७० मोटारींना पर्याय देते. लांब पल्ल्याची बस शेकडो मोटारींना पर्याय देते. वाहतुकीची व्याख्या: माणसे, सामान व वाहनांचे एका स्थानाहून दुसऱ्या स्थानापर्यंत होणारे स्थलांतर किंवा हालचाल. पुढील वाहतुकीच्या तक्त्यावरुन हे लक्षात येईल की मोटार हे वाहतुकीचे माध्यम मानणे ही चूक आहे.

पूर्ण रहदारी चालू असताना रस्त्यावरील वाहने व त्यांनी व्यापलेली जागा आणि दिलेली सेवा याबाबतची सन १९९६ मधील स्थिती :

| वाहने | व्यापलेली जागा % | वाहतुकीतील वाटा |
|---|---|---|
| बेस्ट (सार्वजनिक) | ४ | ६१ |
| टॅक्सी-रिक्शा (निम सार्वजनिक) | १२ | ३२ |
| मोटार (खाजगी) | ८४ | ७ |

बसला सक्षम बनवणे त्यांत वाढ करणे याची गरज असताना त्याविरुद्ध ५५ उड्डाण पुल, सागरी रस्ता अशा मोटारींची संख्या वाढवण्याच्या योजना आणल्या गेल्या. त्यामुळे प्रवासात होणारा विलंब व प्रदूषण वाढत गेले. मुंबईत वाहतुक अराजक तयार झाले.

रस्ते मोटारींसाठी असतात हा गैरसमज आहे.

**सरकारी अहवालातील सत्य...**

महाराष्ट्र राज्याचे मुख्य सचिव श्री.के.जी.परांजपे यांच्या अध्यक्षतेखालील समिती (१९८७), 'एम.एम.आर.डी.ए.' चा सर्वकष वाहतुक आराखडा (योजना) (१९९४) आणि मुंबई नागरी परिवहन योजना-२ (१९९८) या सर्व सरकारी योजनांनी सार्वजनिक वाहतुकीला प्राधान्य व मोटारीला विरोध हेच सूत्र दिले होते. परंतु जनतेची दिशाभूल करून त्यांना बहकवून चुकीचे प्रकल्प राबवले गेले. आताही सागरी रस्ता व मेट्रो बाबत तेच घडत आहे. सागरी रस्ता वाहतुक कोंडी व प्रदूषण वाढविणार आहे. तर, पादचारी, बस व सायकलला प्रोत्साहन दिल्यास मेट्रोसारख्या प्रचंड उर्जाग्राही व शहरातील जुन्या नागरिकांचे विस्थापन करणाऱ्या, तणाव वाढवणाऱ्या महापूर व भूकंपाच्या दृष्टीने धोकादायक ठरणाऱ्या खर्चिक प्रकल्पाची गरज नाही.

**आरोग्यावर परिणाम...**

रस्ते बांधणीसाठी वापरले जाणारे पैसे, सर्व नागरिकांकडून येतात, मात्र ते वापरले जातात वाहतुकीची नगण्य क्षमता असलेल्या मोटारींसाठी. मोटार वापरणारी थोडीशी माणसे स्वत: बरोबर मोटारी न वापरणाऱ्या निरपराधांची फुप्फुसे खराब करण्यास कारणीभूत होतात. रस्त्यांवरील ९० टक्के अपघाती मृत्यूंना मोटार जबाबदार आहे. भारतात दरवर्षी सुमारे ४ लाख माणसे वाहन अपघातात बळी पडतात. पुणे-मुंबई एकस्प्रेस वे वर पहिल्या दोन वर्षांत प्रत्येक महिन्यात एक हजारपेक्षा जास्त अपघाती मृत्यु झाले.

मोटारींमुळे कार्बन डाय ऑक्साईडसह सुमारे १००० विषारी संयुगे वातावरणात उत्सर्जित केली जातात. कर्करोग (कॅन्सर), दमा, हृदयविकार, मेंदू विकार इत्यादी तसेच श्वसन संस्थेचे व इतर प्राणघातक आजार होतात. तणावांचा मनावर विपरित परिणाम होतो.

**पर्यावरणाचा नाश...**

जर्मनीतील हायडेलबर्ग विश्वविद्यालयाच्या अभ्यासाप्रमाणे एक टन वजनाच्या एका मोटारीच्या निर्मितीसाठी २५ टन लोखंड, बॉक्साईट (अॅल्युमिनिअमच्या निर्मितीसाठी) इ. खनिजांचे उत्खनन केले जाते, तर लाखो घन मीटर हवा प्रदुषित केली जाते. रस्ते, पूल इ. च्या बांधणीसाठी सिमेंट, स्टीलच्या निर्मितीसाठी डोंगर तोडले जातात. पर्यावरणाचा मोठ्या प्रमाणात नाश होतो. मोटारींची संख्या वाढवल्याने अधिकाधिक रस्ते रुंद करणे यासाठी जंगलांचा नाश होतो. जंगलातील प्राणीमात्रांचे जीवन उद्ध्वस्त होते. पूर्वी रस्ते नसलेल्या भागात पक्के रस्ते बांधल्यानंतर आसपासचे जंगल वेगाने तोडले जाते. डोंगर बोडके होतात. मोटार व रस्त्यांचा कैफ पृथ्वीच्या, निसर्गाच्या मूळावर उठला आहे. मोटार व कॉंक्रीटचे नाते आहे. त्यांच्यामुळे निसर्ग व जीवन नष्ट होत आहे.

**इतर दुष्परिणाम...**

मोटारींसाठी लागणाऱ्या पेट्रोल, डिझेल तसेच टायर, फायबर व इतर भागांच्या निर्मितीसाठी लागणारे क्रूड ऑईल आयात यासाठी दरवर्षी लाखो कोटी रुपयांचे परकीय चलन खर्च होते.

**मोटारींना पर्याय...**

मोटारीऐवजी चालणे, सायकल, बस यांना वाहतुकीचे माध्यम बनवल्यास अनावश्यक रस्ते बांधणी, रुंदीकरण, उड्डाणपूल, सागरी रस्ता, मेट्रो इ. अनावश्यक खर्चिक गोष्टी संपुष्टात येतात. मोटारींचा वापर मानवद्रोह, देशद्रोह व सृष्टीद्रोह आहे तर सायकलचा वापर भावी पिढ्यांवरील व देशावरील प्रेम दाखवतो.

**सायकल चालवू - प्रदूषणापासून शहर वाचवू...**

दिल्ली शहरातील नागरिकांनी प्रदूषणापासून मुक्तता करण्यासाठी सम - विषम क्रमांकाच्या गाड्या वापरण्याच्या निर्णयास पाठींबा दिला आहे.

मुंबईत रोज सुमारे १००० टन वायू प्रदूषण होते. यातील बहुतांश भाग वाहनांमुळे होतो. रोज २००० अस्थमा आणि १५०० ब्रॉंकायटीसचे नवे बालरुग्ण इस्पितळात नोंदले जातात असे महानगरपालिकेचा सन १९८८ चा अहवाल म्हणतो. इतर आजार आणि वयोगटांचे रुग्ण वेगळे. या संख्येत वाढ झाली आहे. मुंबई शहर गॅस चेंबर बनल्याचा अनुभव आपण वेळोवेळी घेत आहोत. मुंबईत रोज रस्ते (प्रामुख्याने मोटारींमुळे) व रेल्वे अपघातांत सुमारे २५ ते ३० माणसे मृत्यु पावतात. यावर उपाय म्हणून आपण एक चांगली कृति करू शकतो. आपण सायकल चालवू शकतो. यामुळे प्रदुषणात मोठी घट होईल. मुला-बाळांचे व इतरांचेही आरोग्य सुधारेल. मोटार व रेल्वे अपघातात बळी जाणाऱ्यांचे जीव वाचतील. **सायकलमुळे प्राणघातक अपघात होत नाही.**

दहा वर्षापूर्वी युरोपमध्ये; जगातील आजपर्यंतचा सर्वाधिक कल्पक व हितावह शोध ठरविण्यासाठी जनतेचे मत आजमावले गेले. त्यात सायकलला सर्वाधिक मते मिळाली. **जर्मनी, बेल्जिअम, स्वीडन, हॉलंड (नेदरलॅंड) फिनलॅंड, नॉर्वे, डेन्मार्क, इत्यादी देशांतील सुजाण नागरिक सायकलचा दैनंदिन जीवनात वापर करतात. हे देशच सुखी जीवनाच्या क्रमवारीत सर्वात वर आहेत.** सुमारे सात वर्षांपूर्वी अमिताभ बच्चन यांनी नेदरलॅंडला भेट दिली. तेव्हा तेथील नागरीकांतर्फे त्यांना 'सायकल' भेट म्हणून दिली गेली. परंतु जागतिक तापमानवाढीमुळे बुडू घातलेल्या या देशाचा संदेश आपण समजुन घेतला नाही. उलट समुद्रातील हस्तक्षेप थांबल्यामुळे बेकार झालेल्या तेथील बांधकाम कंपन्यांना मुंबईच्या समुद्रात भराव करून 'सागरी रस्ता' करण्यास आमंत्रण दिले जाते. हे हास्यास्पद आहे. सुखी जीवनासाठी प्रसिद्ध असलेल्या देशांनी मोटारीला नकार दिला आहे. ते सायकलला पसंती देतात. बस व रेल्वे अधिक सक्षम करतात.

एका मोटारीसाठी लागणाऱ्या जागेत अनेक सायकल चालू शकतात. सायकल चालवल्याने व्यायाम घडतो व आरोग्य सुधारते. परस्परांशी संवाद वाढतो. खर्च वाचतो. जीवन आनंददायक होते व शहर ताणरहित बनते. चला आपल्या मुला-बाळांना, वृद्धांना जपूया. सायकलचा वापर करुया.


**✤ आपले नम्र ✤**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **अॅड. गिरीश राऊत** | **डॉ. मंगेश सावंत** | **राजेंद्र फातर्पेकर** | **विक्रांत कर्णिक** | **धनंजय ठाकूर** |
| **रविंद्र पेडणेकर** | **विवेक दळवी** | **विजय जाधव** | **प्रा. सदानंद पवार** | **कुंदन राऊत** |
| **अॅड. राजेंद्र सामंत** | **उल्हास राठोड** | **विजया चेंबूरकर** | **सतीश कदम** | **महमद शाहीद** |
| **मोरेश्वर ठाकूर** | **कन्हैयालाल शर्मा** | **सुनील दाबके** | **डॉ.संजय साळुंखे** | **अनिल सावे** |
| **रवि चव्हाण** | **देवदत्त पंडित** | **अॅड.राहुल पवार** | **राहुल राव** | **विद्याधर जाधव** |
| **नंदा सावंत** | **वसंत पाटील** | **प्रवीण भेंडे** | **रवींद्र पाटील** | **अशोक जोशी** |
| **संजय पारकर** | **अनिल ठाणेकर** | **मिलिंद राणे** | **राजश्री चोचे** | **अनंता बेळगावकर** |

**भारतीय पर्यावरण चळवळ ९८६९०२३१२७**